पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे.पीडब्ल्युसी या कंपनीला मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑक्टोबर, २०१९

**वाचा :**

१. माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/o Directorate of IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्र. गृहआ २०१५/प्र.क्र.२३०/आस्था-२, दि.२०.०५.२०१५.
३. शासन निर्णय क्र. सीसीटी ३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५.
४. गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी ३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि.२५.०७.२०१६.
५. पोलीस आयुक्त, पुणे यांचे दि.०३.०६.२०१९ रोजीचे पत्र.
६. गृह विभाग, उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे (HPC) दि.१३.०६.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
७. माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD मातंसं ०८०/४/२०१४-O/O, दि.०९.०५.२०१९

**प्रस्तावना :**

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे. पीडब्ल्युसी कंपनीची गृह विभाग, शासन निर्णय दि.२९.०५.२०१५ अन्वये दि.३०.०४.२०१६ रोजीपर्यंत नेमणूक करण्यात आली होती. गृह विभाग, शासन निर्णय दि. २५.०७.२०१६ अन्वये दि.३१.१०.२०१६ पर्यंत, गृह विभाग, शासन निर्णय दि.०५.०६.२०१७ अन्वये दि.३०.०६.२०१७ पर्यंत, गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.०७.२०१७ अन्वये दि.३०.०६.२०१८ पर्यंत व गृह विभाग, शासन निर्णय दि.१३.१२.२०१८ अन्वये दि.३०.०६.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वयन कालावधी दरम्यान शासन व पोलीस प्रशासनास तांत्रिक सहाय्य करण्यासाठी सल्लागारांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने दि.१३.०६.२०१९ च्या उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये मे. पीडब्ल्युसी कंपनीला पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१३.०६.२०१९ रोजी पार पडलेल्या बैठकीतील निर्णयानुसार मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर्स प्रा. लि., या कंपनीस पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून खालीलप्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे :-

पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. पीडब्ल्युसी कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागारास व एका सल्लागारास पुर्णवेळ तत्वावर दि.१ जुलै, २०१९ ते दि.३० ऑक्टोबर, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ येथे नमुद दि.०९.०५.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील तथापि माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागु राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणुक (Empanelment) करणे आवश्यक राहील.

३. सर्व सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे दरमहा-प्रती व्यक्ती (Man-Month) तत्वानुसार असेल. सर्व सल्लागारांचे दरमहा देयके शासनास सादर करतांना सल्लागारांनी महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील / अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

४. पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांच्या मानधनाबाबतचा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२३१५३४२०४६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2019.10.23 15:36:39 +05'30'

**( दिनेश आ. सस्ते )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, पुणे.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. निवडनस्ती, पोल-३.

****